पुणे जिल्ह्यातील शिरुर तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन

सार्वजनिक बांधकाम विभाग

शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२१/प्र.क्र.४४ /नियोजन-२

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक- २० सप्टेंबर, २०२१.

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र जा.क्र.मुअ(पुणे)/ का-२/रेशा/१०/६७८/२०२१, दि.०८/०२/२०२१.

प्रस्तावना :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भाधिन पत्रान्वये पुणे जिल्ह्यातील शिरुर तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, पुणे यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, पुणे यांचा ठराव विचारात घेता, सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

शासन निर्णय :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, पुणे यांचा ठराव विचारात घेऊन पुणे जिल्ह्यातील शिरुर तालुक्यातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | सामाविष्ठ रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | प्रजिमा-४ ते निमगाव सावा ते जांबुत फाकटे टाकळे हाजी अहमदाबाद फाटा सोनेसांगवी वाघाळे रस्ता (प्रजिमा-९). | ग्रामीण मार्ग -६३ | (०/०० ते ९/००) ९.०० कि.मी. | १५.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१९९ |
| | | ग्रामीण मार्ग -७० | (०/०० ते ६/००) ६.०० कि.मी. | | |

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | सामाविष्ठ रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| २. | शिक्रापूर-हिवरे-कान्हूर-कवठे-फाकटे-चांदोह-पिंपरखेड पारगाव रस्ता (रामा-१७७ ते पिंपरखेड व पिंपरखेड ते पारगाव रस्ता) | ग्रामीण मार्ग -४१ | (०/०० ते ५/८००) ५.८०० कि.मी. | **१२.८०० कि.मी.** | प्रमुख जिल्हा मार्ग-२०० |
| | | ग्रामीण मार्ग -८० | (०/०० ते ७/००) ७.०० कि.मी. | | |
| ३. | शिक्रापूर-जातेगाव खु. करंदी-पराडमाळा-केंदूर-कन्हेरसर-प्रजिमा रस्ता | इतर जिल्हा मार्ग -१४३ | (०/०० ते १२/९००) १२.९०० कि.मी. | **१६.३०० कि.मी.** | प्रमुख जिल्हा मार्ग-२०१ |
| | | ग्रामीण मार्ग -१४ | (०/०० ते ३/४००) ३.४०० कि.मी. | | |
| ४. | भाकरेवाडी-भैरवनाथ वाडी-टाकळे-हाजी-मसे ते डोंगरगण रस्ता. | इतर जिल्हा मार्ग -१४१ | (०/०० ते ७/०००) ७.००० कि.मी. | **१८.६०० कि.मी.** | प्रमुख जिल्हा मार्ग-२०२ |
| | | ग्रामीण मार्ग -१०२ | (०/०० ते १/६००) १.६०० कि.मी. | | |
| | | ग्रामीण मार्ग -०७ | (०/०० ते १०/००) १०.०० कि.मी. | | |
| | **एकूण** | | | **६२.७०० कि.मी.** | |

उपरोक्त रस्ते दर्जोन्नत झाल्यास रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील पुणे जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **६२.७० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (४७६९.३३+ ६२.७०) म्हणजेच **४८३२.०३ कि.मी.** इतकी व इतर जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत १९.९० कि.मी. इतकी घट होवून (१९४८.१३ - १९.९०) म्हणजेच **१९२८.२३ कि.मी.** इतकी तसेच ग्रामीण मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत **४२.८०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (९८८४.२९६-४२.८००) म्हणजेच **९८४१.४९६ कि.मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११००४१६०२०१२८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2021.10.04 16:04:30 +05'30'

**( ग.सं. कचरे )**

**अवर सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) जिल्हाधिकारी, पुणे .

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.

५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पूर्व) विभाग, पुणे.

७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

८) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.

९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

१०) निवडनस्ती.